# काशीपीठाचें प्राचीनत्व.



वि॰ म॰ वीरभद्रशास्त्री वेदतीर्थ.



# काशीपीठाचें प्राचीनत्व.


लेखक व प्रकाशक

पं० चि० म० वीरभद्रशास्त्री वेदतीर्थ

शैवभारती भवन, काशी.


( किंमत दोन आणे )


मुद्रक—

कृ० व० पावगी,

हितचिन्तक प्रेस, रामघाट, काशी.

ई० सन १९३४

# सूचना.

अनादिकालापासून काशीक्षेत्रांत विराजमान श्रीजगद्गुरु विश्वाराध्य महासंस्थान अत्यन्त अनुग्रहपूर्वक विद्यादान आणि अन्नदान करण्यामध्यें प्रसिद्ध आहे. सदर संस्थान कोणाच्या ही निन्दा स्तुतींची परवा न करतां आपलें कार्य अविच्छिन्नपणे चालू ठेवित असते ही गोष्ट सर्व वीरशैव मंडळीना विदितच आहे. कांहीं अवैदिक लोकानीं वीरशैव सनातनधर्माचे वेद, आगम, आचार्य, चातुर्वर्ण्य, शिखा वगैरांच्या विरुद्ध प्रचार करण्याचा व निन्दा पसरविण्याचा कार्यक्रम कर्नाटक देशामध्यें चालू केला आहे. आतां त्याच लोकानीं महाराष्ट्रांमध्यें ही निन्दात्मक कार्याचा प्रारंभ केलेला आहे. आणि एक दोन व्यक्ति काशीमध्यें ही या अधर्माचा प्रचार करण्यास इच्छित आहेत. त्याच उद्देश्याने कीं काय प्रेरित होऊन "गुरुलिंगदेवरु वेळगांव" नामक व्यक्तीनें सोलापुरच्या 'सुदर्शन' पत्रांमध्यें एक लेख प्रकाशित करून परम पवित्र अशा श्रीविश्वाराध्यपीठाविषयीं भ्रम व निन्दा पसरविण्याचें काम केले आहे. यद्यपि त्या लेखांत कांहींच तथ्य नाहीं, अशा प्रकारचे लेख विरोधी पत्रांमध्यें नेहमी निघतच असतात, परन्तु अशा प्रलापानां उत्तर देण्याची आवश्यकता ही नाहीं तथापि लोकांना सावधान करण्याकरितांच हें पुस्तक प्रकाशित केलें जात आहे. सुज्ञ वाचक याचे एक वेळ शान्त चित्तानें मनन करतील अशी पूर्ण आशा आहे.

काशी

ता० २०-५-३४ ई०

प्रकाशक.

ॐ

श्रीजगद्गुरुविश्वाराध्याय नमः

# काशीपीठाचें प्राचीनत्व.

( लेखकः—वेद-काव्य-स्मृतितीर्थ, धर्माचार्य, साहित्यविशारद,
**पंडित चि० म० वीरभद्र शास्त्री मु० काशीक्षेत्र.** )

सोलापूर येथील "सुदर्शन" नामक साप्ताहिकाच्या ता० १९-३-३४ च्या अंकांत **"उत्तर हिंदुस्तानांतील वीरशैव मठ"** नामक एक लेख कांहीं कानडीपुस्तकें अर्धवट वाचून एका विरक्तवटूनें प्रसिद्ध केला आहे. त्यांतील विषय असंवद्ध असूनहि चरित्राचें मिषानें काशी येथील जंगमवाडी-मठाचें म्हणजे **श्रीजगद्गुरुविश्वाराध्य महापीठाचें प्राचीनत्व** खोडून काढण्यास त्यानें हात घातला आहे. कानडी पुस्तकांच्या आधारानें लिहिलेला हा लेख कानडींतच प्रसिद्ध केला तर आपले अपसिद्धांत उघड होऊन आपला उपहास होईल म्हणूनच कीं काय त्याने हा लेख मराठी वर्तमानपत्रांत छापून अनभिज्ञ महाराष्ट्रीय वीरशैवांत गैरसमज उत्पन्न करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो.

या लेखाचा लेखक बेळगांवचा गुरुलिंगप्पा यापूर्वी चारपांच वर्षे श्रीजगद्गुरु विश्वाराध्य पीठामध्यें आश्रित म्हणून रहात होता; पण अलीकडे कांहीं दुर्विरक्तांच्या जाळ्यांत सांपडल्यामुळें जगद्गुरु पीठांच्या गौरवाचा हेवा वाटून तो असंबद्ध प्रलाप काढीत असला तर त्यांत कांहींच नवल नाहीं. असल्यांच्या लेखावर खरे पहातां टीका करण्याचीहि कांहीं जरूरी नाहीं; पण महाराष्ट्रीय

वाचकानां एकदां सावध करण्यासाठींच खालील विषय लिहिला जात आहे. गुरुलिंगप्पाचा लेख केवळ काशीपीठासंबंधी असून व तो सुदर्शनमध्यें छापला असूनहि तो काशीसंस्थानाकडे पाठविण्यांत आला नाहीं यावरून समाजांत कसा तरी गैरसमज माजविण्याचाच त्याचा उद्देश होता हें उघड होते. सुदर्शनपत्राचा सदर अंक आमच्या एका मित्राकडून विलंबानें मिळाल्यामुळें हें प्रत्युत्तर प्रसिद्ध करण्यास वेळ लागला.

## वीरशैवमताचें प्राचीनत्व.

गुरुलिंगप्पाच्या लेखाचे पहिल्याच प्याऱ्यांतील "वीरशैवमत देखील कल्याणच्या विज्जलराजाचा मंत्री वसवाच्या काळीं उदय पावून" या वाक्यानें 'प्रथमचुम्बने दन्तभंगः' या म्हणी प्रमाणें त्याचें मूर्खत्व वाहेर पडले आहे. कारण हें म्हणणें कांहीं परमतीय अज्ञानी लोकांच्या कल्पनेंतील आहे; एरवी कोणत्याहि ऐतिहासिक प्रमाणानीं तें सिद्ध झालेलें नाहीं शिवाय वसवाच्या नातवंडाच्या काळचा एक शिलालेख वेळगांव जिल्ह्यांतील **अर्जुनवाडगांवीं** सांपडला आहे. ( पहा "शिवानुभव" मासिक मार्च सन १९२८ ई० विजापूर ) त्यांत 'वसवनु पुरातन जंगमभक्तनु' म्हणजे वसव हा एक पुरातनजंगमांचा भक्त पूर्वी होऊन गेला असें स्पष्ट लिहिलेले असल्यामुळें वसवा पूर्वींहि वीरशैवमत विस्तार पावलेले होते ही गोष्ट लहान मुलांनां हि कळण्यासारखी आहे. वसवानंतर तीस वर्षांनीं त्याचे परमभक्त **पालकुरकि सोमनाथ** व **हरिहर** यांनीं आपल्या 'वसव कथेत' फार प्राचीन काळापासून वीरशैवमत होते असेंच दाखवून दिले आहे. या शिवाय सोमनाथानें ( मद्रासेंत छापलेल्या ) आपल्या तेलगु भाषेंतील **'अनुभवसार'** नामक ग्रंथांत 'भृंगि रिटि गोत्रुडनु' म्हणजे आपण भृंगिगोत्राचे आहोंत असें स्पष्ट लिहिले असल्यामुळें हल्ली प्रमाणेंच त्यावेळींहि पांच गोत्रें प्रचारांत होती ही गोष्ट घंटानिनादा प्रमाणें उघड होत आहे. इ० स० ९४० मध्यें होऊन गेलेल्या नन्ने **चोळदेव** नामक आंध्रराजानें **कुमारसंभव**

नामक ग्रंथ रचून तो **श्रीजंगम मल्लिकार्जुन देवाचार्यांनां** अर्पण करून त्यांच्या अप्रतिम **पांडित्याचें, महायोगित्वाचें** व **जगद्गुरुत्वाचें** वर्णन स्पष्ट शब्दांत केलेले आहे. हे जंगम मल्लिकार्जुनदेव श्रीशैलसिंहासनाचे संबंधीं होत असें त्यानें सूचित केले आहे. म्हणजे बसवापूर्वी तीनशेवर्षे अगोदर सुद्धां प्रबल गुरुवर्ग होता ही गोष्ट इतिहासानेंच सिद्ध होत आहे. वरील परमोत्तम ग्रंथ १९०९ सालीं प्रसिद्ध करून वीरशैव इतिहासावर महदुपकार केल्याबद्दल सुप्रसिद्ध प्रो० एम्० व्ही० रामकृष्णकविगारु एम्० ए० यानां वीरशैवांनीं कृतज्ञता दाखविली पाहिजे. असो.

वरील प्रमाणेंच **वीरशैवरत्न, वीरशैवांची स्थिति, वैष्णविझम ॲण्ड शैविझम** ( Vishnavism and Shivism ), **मैसूर ॲण्ड कूर्ग** ( Mysore and Coorg ), **डायनास्टीज आफ् केनरीज डिस्ट्रिक्टस** ( Dynasties of Kenares Districts ), **मैसूर गेझेटिएर** ( Mysore Gazetteer ), **कर्नाटक क्रॉनॅलॉजी** (Karnatic Chronology), **दि रिलिजस क्वेस्ट ऑफ् इंडिया** ( The Religious Quest of India ), **कॉस्ट ॲन्ड ट्राइब्ज ऑफ़ सदर्न इंडिया** (Castes & Tribes of Southern India) वगैरे अनेक पुस्तकांतून **'वीरशैवमत पंचाचार्यांनीं स्थापन केले'** 'तें अत्यंत प्राचीन आहे' असें ऐतिहासिक आधार देऊन सिद्ध केलेले आहे व वेदप्रामाण्य असलेल्या शिवागमांतील सिद्धान्तांचें समर्थन केलेले आहे. अशी वस्तुस्थिति असतानां वीरशैवमत बसव कालांत उत्पन्न झाले असा गैरसमज पसरविण्यास पुढें झालेले कांहीं मुंडी आत्मद्रोह करण्यासच उद्युक्त झाले आहेत दुसरें कांहीं नाहीं.

## केळदिनृपविजयाची योग्यता.

इ० स० १९२१ सालीं मैसूर ओरियंटल लॅयब्ररीनें छापून प्रसिद्ध केलेलें **'केळदिनृपविजय'** नामक कानडी काव्य **लिंगण्णाकवीनें** सुमारें

इ० स० १८०४ मध्यें लिहिले आहे. म्हणजे आज पासून केवळ सव्वाशे वर्षा पूर्वींच हें पुस्तक लिहिले गेलेले आहे. या काव्यग्रंथांत इ० स० १५०२ पासून १७६५ पर्यंत होऊन गेलेल्या केळदि घराण्यांतील राजांची चरित्रें वर्णिलेली आहेत. हे राजे विजयनगरच्या महाराजाचे मांडलिक असल्यामुळें प्रसंगवशात् विजयनगरच्या राजांची वर्णनेंहि त्या ग्रंथांत आलेली आहेत. पण तेही समंजस नाहींत. कारण अशीं काव्यें लोकरंजनासाठीं लिहिली जातात व त्यांत कांहीं खोटें, कांहीं दंतकथा, कांहीं कल्पित घुसडल्याशिवाय कोणीहि सोडलेले नाहीं. उदाहरणार्थः—कल्हणकृत **राजतरंगिणी,** वाणभट्टकृत **हर्षचरित,** पद्मगुप्तकृत **नवसाहसांकचरित,** बिल्हणकृत **विक्रमांकदेवचरित,** आणि **हम्मीरकाव्य, अच्युतरायाभ्युदय, मथुराविजय, पृथ्वीराजविजय,** वगैरे काव्यें आपल्या देशाचे ऐतिहासिक ग्रंथ मानले जातात. त्यामध्यें सत्यकथन थोडे असले तरी भारुड विषय बराच आहे ही गोष्ट ते ग्रंथ सूक्ष्मपणें वाचणाऱ्याला दिसून आल्याशिवाय राहणार नाहीं. त्याचप्रमाणें केळदिनृपविजया सारख्या अर्वाचीन ग्रंथांत अतिशयोक्ति व असंबद्ध विषय आले तर त्यांत कांहींच नवल नाहीं. म्हणूनच या पुस्तकाचे संशोधक **श्री० ए० आर० कृष्णशास्त्री** म्हणतात कीं, **"केळदिनृपविजयांतील केळदी राजांची कृत्यें व काळ जरी खरा मानला तरी सुद्धां चौडप्पाला नागानें गुप्तधन दाखविलें, दोड्डसंकण्णानाईकानें दिल्लीस जाऊन अंकुशखानाला मारलें वगैरे वर्णनें कल्पितच मानावी लागतील."** ( के० नृ० वि० ग्रंथ उपोद्घात पान ६ ) तर मग केळदिनृपविजय हा ग्रंथ ऐतिहासिक आहे व त्यांतील वीरशैव मठांच्या स्थापनेची माहिती अगदीं खरी आहे असें मानणें ही अविवेकता नव्हे काय ? उदाहरणासाठीं एकच गोष्ट घेऊन तिचें परिच्छण करूं. विश्वविख्यात **जगद्गुरु रेवणसिद्धानीं श्रीशंकराचार्यांना चंद्रमौळीश्वरलिंग** दिले ही गोष्ट अनेक ऐतिहासिक प्रमाणांनी सिद्ध झाली आहे व ती परमतीय लोकांनींहि मान्य केलेली आहे. पण लिंगण्णाकवी या केळदिनृपविजयांत लिहितो कीं, श्रीरेवणसिद्धांनीं श्री विद्यारण्यस्वामींना तें लिंग दिलें ( केळदि नृपविजय ग्रंथ

पान १६ व २२१ ) हें लिहिणें किती खोटें व इतिहासविरुद्ध आहे तें कोणालाहि कळण्याजोगे आहे. कारण १३३७ मध्यें विद्यारण्यस्वामी झाले व त्यापूर्वी इ० स० ११६० मध्यें बसवानें वैदिकमताविरुद्ध प्रयत्न केल्यामुळें वीरशैवांचे बाबतींत स्मार्त ब्राह्मणांचें मत अगदीं प्रतिकूल झाले होते. अशा परिस्थितींत वीरशैव जगद्गुरु कडून विद्यारण्यस्वामी लिंगाचा स्वीकार करतील ही गोष्ट अव्यवहार्य असल्याचे अगदीं उघड दिसते. म्हणूनच विद्यारण्यांनीं आपल्या **सर्वदर्शन संग्रह** नामक ग्रंथांत शैव, रामानुज, शाक्त वगैरे सर्व मताबद्दल लिहिले असून वीरशैवमताबद्दल लिहिण्याचे मात्र जाणून बुजून टाळले आहे. अथवा चौदाव्या शतकांत वीरशैवमतच प्रचारांत नव्हते असें म्हणावे लागेल; पण तशी वस्तुस्थिति नाहीं. इ० स० च्या दुसऱ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंत वीरशैवांचें आचरण वेदागम संमतच होते. त्यावेळीं वर्णसंकर करणारे कोणीच झाले नाहींत. त्यामुळें स्मार्तादि परमतीय वीरशैव-मताच्या जगद्गुरु पंचाचार्यांचीहि असाधारण भक्ति करीत. म्हणूनच श्रीशंकरा-चार्यासारख्या सुप्रसिद्ध तपस्वी पंडितानें श्रद्धायुक्त अंतःकरणानें जगद्गुरु रेणुकाचार्याकडून लिंग घेतले असले पाहिजे. ही गोष्ट **वेदान्तसार वीरशैव चिन्तामणि, रेणुकविजय, गुरुवंशकाव्य** वगैरे प्राचीन ग्रंथांत वर्णिलेली आहेच; पण ज्या केळदि घराण्यांतील राजांची चरित्रें केळदिनृप-विजयांत वर्णिलेली आहेत त्याच वंशातील हिरियबसवप्पा नायकानें ( बसव-राजानें ) इ० स० १७१० मध्यें रचिलेल्या **शिवतत्त्वरत्नाकर** नामक ग्रंथांत चवथ्या तरंगामध्यें श्रीजगद्गुरु रेवणसिद्धानीं शंकराचार्यांना दिलेलें चंद्रमौलीश्वर लिंग श्रीविद्यारण्यस्वामी कडे गुरुपरंपरेनें आले असें स्पष्ट लिहिले आहे. केळदिनृपविजयाचा कर्ता लिंगण्णा यानें सुद्धां वरील शिवतत्त्वरत्नाकर ग्रंथ वाचला आहे असें केळदिनृपविजय दहावा आश्वास पंधरावें पद्य यावरून म्हणावे लागते. पण लिंगण्णाकवि स्मार्त ब्राह्मण असल्यामुळेंच वीरशैव जगद्गुरु रेवणसिद्धानीं शंकराचार्यांनां दिलेल्या लिंगाचा विषय लिहिण्यास त्याला संकोच वाटला असावा. पण ही इतिहासप्रसिद्ध गोष्ट अजीबात टाळणें अयोग्य समजून श्री रेवणसिद्धाकडून श्रीविद्यारण्य स्वामींना तें लिंग मिळाले असें

कल्पून त्यानें त्यांतल्या त्यांत केवळ आपलें मनाला समाधान करून घेतलेले दिसते. लिंगण्णाकवीनें श्रीशंकराचार्यांनां मात्र जगद्गुरु वगैरे महापदव्या लिहिल्या आहेत यावरून त्यांच्या बद्दल त्यांना विशेष आदर होता हें उघड आहे व म्हणून त्यानें लिंगप्रदानाचा विषय वरील प्रमाणें बदलला असणें स्वाभाविकच आहे. विद्यारण्यस्वामींचें कालांत श्री जगद्गुरु रेवणसिद्ध होते ही गोष्ट इतिहास संशोधक कधींच मान्य करणार नाहींत. असो.

या लिंगण्णाकवीनें केळदिराजानीं ठिकठिकाणीं केलेल्या दानधर्मांचें वर्णन विशेषपणें केले आहे. केळदिराजांच्या आश्रयालाच तो असल्यामुळें त्याला तसें करणें भागच होते पण त्या वर्णनांत त्यानें कांहीं चमत्कार केले आहेत. चमत्कार हा कीं, स्मार्त मठानां केलेल्या दानाचा उल्लेख नुसता सहजा सहजीं केला आहे व वीरशैव मठानां दिलेल्या दानांचा उल्लेख मात्र जणुं काय तो मठच या राजांनीं स्थापून चालविला आहे अशा रीतीनें केला आहे. या वरून केळदिनृपविजयाचा लेखक लिंगण्णाकवि स्मार्तमताभिमानी होता. इतिहास प्रसिद्ध गोब्राह्मणप्रतिपालक, आर्यधर्मसंरक्षक छत्रपति शिवाजी महाराजांच्या वंशावरही सांकर्याचा कलंक फासण्यास कमी केले नाहीं ( केळदिनृपविजय पान १३७ पहा ) व अशा अनेक दंतकथा गोळा करून त्यानें हा ग्रंथ लिहिला असला पाहिजे ही गोष्ट संशोधकांच्या लक्षांत आल्या शिवाय राहणार नाहीं. तर मग हा ग्रंथ वीरशैवांचा धार्मिक इतिहास समजण्यास योग्य साधन मानतां येणार नाहीं. एवढेंच नव्हे तर तो शुद्ध इतिहास ग्रंथच नव्हे हें निःसंशय सिद्ध होते. या पुस्तकाबद्दल एवढा विचार करण्याचें कारण हेंच कीं त्यामध्यें संकण्णनायक दिल्लीहून काशीक्षेत्रीं आला असतां त्यानें श्री जगद्गुरुविश्वाराध्यमठाला दानधर्म केल्याचा उल्लेख आहे. लिंगण्णाकवीच्या अतिशयोक्तिमुळें मूळविषय अगदीं विसंगत झाला आहे. बेळगांवचा गुरुलिंगप्पा हा विषय नीट समजून न घेतांच, काशीचा जंगमवाडीमठ केळदिराजानीं बांधला, बसव कालांतच हा मठ पुढे आला वगैरे खोटीं विधानें उगीच विचार-शून्यपणें महाराष्ट्रीय वैष्णवांनें "सुदर्शन" नामक पत्रांत प्रसिद्ध करीत

आहे. पण मूळ विषय सावधान चित्तानें समजून घेतल्यास हा **गुरुलिंगप्पा** " मोठादगडप्पा " आहे असें कोणालाहि वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

## श्रीविश्वाराध्यपीठाचा इतिहास.

केळदिनृपविजय ग्रंथाच्या ५९ व्या पानांत इतर विषयांच्या अनुषंगानें काशी विश्वाराध्यपीठासंबंधी खालील प्रमाणें लिहिले आहे. "फार प्राचीन काळीं नंदीश्वराचा अवतार असलेला शीलवंतनायक नामक थोरपुरुष काशीक्षेत्रीं गेला व सुपाचे पंख बांधून आकाशांत उडून चमत्कार करून दाखविला त्यामुळें संतुष्ट झालेल्या काशीच्या जयचंद राजाकडून दशाश्वमेधघाटाच्या पश्चिमेस जमीन मिळवून त्यावर त्यानें मठ बांधविला. त्यावर मल्लिकार्जुन देवाला पट्ट बांधून व त्याच्या सेवेसाठीं शिष्यांची नेमणूक करून त्या मठाच्या मध्य स्तंभांत आपण समाधिस्थ बसून अंतर्धान पावला " पण लिंगण्णाकवीनें हें कशाच्या आधारानें लिहिले तें कांहीं नमूद केले नाहीं. त्याच्या या लिहिण्यांत दोन मोठ्या चुका दिसत असल्यामुळें व एका मुख्य विषयाचा उल्लेख राहून गेला असल्यामुळें ती हकीकत त्यानें केवळ दंतकथेवरून लिहिली असें सिद्ध होते. लिंगण्णानें येथें **जयचंद्राजाचा** जो उल्लेख केला आहे तो अगदीं चुकीचा आहे. तें नांव **जयनंददेवराजा** असें असले पाहिजे. **नंद** शब्दा ऐवजीं **चंद** शब्द असल्यामुळें " कांहीं पठतमूर्ख " सदर राजाला इ० स० च्या बाराव्या शतकांतील कान्यकुब्ज देशावर राज्य करीत असलेला **जयचंद** राजाच समजतात पण केळदिनृपविजयात कान्यकुब्ज देशाचा हा राजा असा उल्लेख कोठे आला नाहीं. व हें बरोबर नाहीं. **जयनंददेव** नामक प्राचीन राजानें विक्रम संवत् ६३१ मध्यें म्हणजे इ० स० च्या सहाव्या शतकांत श्रीविश्वाराध्यपीठ म्हणजे जंगमवाडीमठाला जंगमपुर नामक जागा ( हल्लीं बनारस हिंदूयुनिव्हर्सिटी असलेली जागा ) दानपत्र लिहून दिली होती. या दानपत्राची नक्कल **वीरशैवेन्दुशेखर** नामक पुस्तकांत व सोलापुरच्या कै० **श्रीमंत अप्पासाहेब वारदांनी** छापलेल्या संस्कृत बसवपुराणातहि आहे.

काशीच्या कै० **श्रीप्रभुनारायणसिंहबहादुर** नामक राजानीं या दानपत्राचें प्रामाण्य कबूल करून इ० स० १९२६ मध्यें त्याचा पुन्हा ताम्रपट करून त्यावर सही करून दिली आहे. ज्यानां खात्री करून घ्यावयाची असेल त्यानीं जंगमवाडीमहासंस्थानांत तो पहावा. जयनंददेवाच्या दानपत्राची प्राचीनता अनेक कोर्टांनीं मान्य केली आहे. बनारस सवजज्ज कोर्टाचे सवजज्ज **बाबू श्रीविन्ध्यवासिनीप्रसाद** यानींहि सदर दानपत्राचें प्राचीनत्व आपल्या ता० २७-११-३३ च्या निकालांत ( जजमेंटांत ) विशेषपणें कबूल केले आहे. या निकालाची नक्कल म्हैसूरच्या **पंचाचार्यप्रभा** साप्ताहिकाचे ता० १८-१२-३३ चे अंकांत छापलेली आहे. एकंदरींत सांगावयाचें म्हणजे तेराशे वर्षापूर्वीं प्रसिद्ध असलेल्या विश्वाराध्य पीठाला जयनंददेवराजानें दिलेल्या भूमीमुळें त्या पीठाचा विस्तार वाढला हें खरें पण त्यानें दिलेल्या भूमींतच नवा मठ स्थापन केला गेला हें लिंगण्णा कवीचें म्हणणें कांहींच विश्वासार्ह नाहीं.

या लिंगण्णा कवीची दुसरी चूक म्हणजे "शीलवंत नायक मठाच्या मध्य स्तंभांत समाधिस्थ बसून अंतर्धान पावला" ही होय. काशी येथील मठांत **कैलासमंटप** म्हणून श्रीविश्वाराध्याच्या पादुका असलेलें एक पीठ ( ज्ञानसिंहासन ) आहे. श्रीविश्वाराध्यानंतरचे सर्वांत पहिले पट्टाधिकारी **श्रीमल्लिकार्जुन जगद्गुरूनीं** विशेष कर्तबगारी केली व ते ३११ वर्षें पर्यंत हयात होते म्हणून पुढें अधिकारावर आलेल्या सर्व जगद्गुरूनां मागील श्रीमल्लिकार्जुन हेंच नांव श्रेयस्कर वाटले. कैलासमंटपाच्या खांबावरहि श्रीमल्लिकार्जुनजगद्गुरुंची मूर्ति उभी असलेली कोरण्यांत आली आहे. अजूनहि त्या मूर्ति खालीं श्रीजगद्गुरु मल्लिकार्जुन महास्वामी हेंच नांव लिहिले असून परंपरेनें प्रसिद्ध आहे. असें असतानां त्या खांबांत बसून शीलवंत नायक अंतर्धान पावले म्हणून लिंगण्णा कवीनें लिहिलें तें असमंजसपणाचेंच होय. कैलासमंटपाजवळच्या आणखी एका खांबावर एक स्त्रीमूर्ति जप करीत असलेली कोरलेली आहे. हीच मूर्ति शीलवंत नायकाची म्हणून तर्क करून कोणी सांगितले कीं काय न देवच जाणे.

आपल्या केळदिनृपविजय नामक ग्रंथांत श्री विश्वाराध्यांच्या नांवाचा उल्लेख लिंगण्णा कवीनें केला हीच मोठी चूक म्हटली पाहिजे. कारण श्री विश्वाराध्यपीठ शिवागमकालपासूनच प्रसिद्ध असल्याबद्दल

"काश्यां विश्वेश्वरे लिङ्गे विश्वाराध्यस्य सम्भवः ।
स्थानं श्रीकाशिकाक्षेत्रे शृणु पार्वति सादरम् ॥"

ही स्वायंभुवागमोक्तीच स्पष्ट प्रमाण आहे. अत्यंत प्राचीन कालीं रचिलेल्या पंडिताराध्यांच्या नारायणोपनिषदावरील शैवभाष्यांत—

" अस्यामुपनिषदि विश्वाराध्यादयस्तु दहरोपासनाविषये "
असें वचन पन्नासाव्या पानांत आहे. त्या वरून श्रीविश्वाराध्यजगद्गुरु उपनिषद्भाष्यकार होते ही गोष्ट स्पष्ट होते. सुमारे साठ वर्षांपूर्वी हें पुस्तक दक्षिण सिकंदराबादेस छापले आहे. शिवाय मद्रास इलाख्यांतील एलूर नगरवासी कै० मल्लिकार्जुन शास्त्रीनां सिद्धान्तशिखामणि, वातुलागम वगैरे फार प्राचीन ताडपत्रावर लिहिलेले पांच ग्रंथ सांपडले होते. विशेष परिश्रमपूर्वक त्या ग्रंथांचें संशोधन करून सुमारे चाळीस वर्षांपूर्वी त्यानीं ते **शिवाद्वैतपञ्चक** या नांवानें तेलगु लिपींत छापले. त्या ग्रंथापैकीं **शंकरसंहितेच्या** प्रारंभीं खालील प्रमाणें जगद्गुरु श्रीविश्वाराध्यांचा महिमा प्रभावी भाषेंत भक्तीनें वर्णिलेला आहे.

" लिंगांगैक्यविमर्शदर्शनाविधं वेदार्थसंवेदिनम् ।
शश्वत्स्थापितशैवधर्मसमयं शिष्यप्रशिष्यान्वितम् ॥
विश्वाराध्यगुरुं नमामि सततं विश्वाभिवन्द्यं विभुम्" ॥

वरील श्लोक फार प्राचीन ग्रंथांतील असल्यामुळें शंकरसंहिता कालीं श्रीविश्वाराध्यजगद्गुरु वीरशैवमताचार्य म्हणून प्रसिद्ध होते हें उघड आहे. सुमारे एकहजार वर्षांपूर्वी **सिद्धनाथ शिवाचार्यांनी** लिहिलेल्या

रेणुकविजयाच्या दुसऱ्या व पांचव्या मंजरींत सुद्धां श्रीविश्वाराध्य व त्यांच्या आश्रमाचें वर्णन विस्तृतपणें आलेले आहे. या रेणुकविजयाची प्राचीन ताडपत्राची एक प्रत आंध्रप्रांत, जिल्हा कर्नूल, आलमपूर नामक गांवी आणि दुसरी मैसूर संस्थानांत शंभुलिंगनबेट्टा जवळ मिळाली आहे व मैसूर वेस्लियन मिशन प्रेस मध्यें हें पुस्तक छापलेले आहे. त्याच प्रमाणें श्रीविश्वाराध्य हे वीरशैवमतसंस्थापक असून काशीसिंहासनाधिपति होत असा उल्लेख वीरशैवसदाचारसंग्रह पान ६, ७, ८, वीरशैवाचारप्रदीपिका पान ३३, वीरशैवान्वयचंद्रिका पान १२३, वगैरे अनेक प्राचीन ग्रंथांतून आहे ही गोष्ट वीरशैव वाङ्मयाचें परिशीलन केलेल्या पंडितानां माहीत नांहीं असें होणार नाहीं.

मद्रास गव्हर्न्मेंट ओरियंटल लॅयब्ररींत असलेल्या 'यजुर्वेदीय वीरलैंग्योपनिषत्' या अतिप्राचीन ग्रंथांत श्रीजगद्गुरु पंचाचार्यांच्या उत्पत्तीचें वर्णन करतानां

"ईशानमुखमासीत् विश्वकर्णगणेशाराध्य उद्भवति"

या वचनांत विश्वाराध्यांचे विश्वकर्ण हें नांव घंटाघोषाप्रमाणें सांगितलेले आहे. द्रविड, आंध्र, कर्नाटक, महाराष्ट्र वगैरे देशांतील वीरशैवांच्या विवाहादि मंगलकार्यांतून पंचकलश पूजन करण्यांत येते. त्यांत श्रीजगद्गुरुविश्वाराध्यांची कलशपूजाहि असते. ती शास्त्रसिद्ध व परंपराप्रसिद्धच आहे. येथवर सांगितलेल्या प्राचीन प्रबल प्रमाणावरून श्रीजगद्गुरुविश्वाराध्यांचे ज्ञानसिंहासन महापीठ काशीक्षेत्रीं आहे ही गोष्ट परम प्रख्यात असल्याचेंच सिद्ध होत असल्यामुळें आधुनिक लिंगण्णा कवीनें आपल्या केळदिनृपविजयांत विश्वाराध्यांच्या पीठाचें नांवहि न लिहावे ही उघड उघड मोठी चूक होय असेंच म्हणावे लागते.

काशीपीठाच्या पट्टावली प्रमाणें ( पं० भालाक्षशास्त्रीनीं शालीवाहन शके १८३८ मध्यें प्रसिद्ध केली आहे ) एकावन्नावे पट्टाधिकारी जगद्गुरु

मल्लिकार्जुन महास्वामी विक्रम संवत् ६३१ म्हणजे इ० स० ५७५ पूर्वी शिवैक्य पावले. त्यांचे शिष्य मल्लिकार्जुनदेव यांना लगेच पट्टाभिषेक झाला किंवा नाहीं तें सांगणें अशक्य आहे. परंतु केळदिनृपविजयांतील माहितीवरून काशीचा राजा जयनंददेव यास खुष करून दक्षिणदेशांतील शीलवंत नायक नामक एका थोर पुरुषानें विशेष भूमि संपादन करून घेऊन श्रीविश्वाराध्याबद्दल असलेल्या गुरुभक्तीनें प्रेरित होऊन पीठाचा जीर्णोद्धार केला व श्रीमल्लिकार्जुनदेवानां पट्टाभिषेक करून त्यांच्या सेवेसाठीं आपल्या शिष्याला तेथें ठेवले. असा अर्थ काढल्यास तो कदाचित कांहीं संगत तरी होईल असें वाटते. पण विश्वाराध्यपीठ शीलवंत नायकानेंच स्थापले असा अर्थ घेतल्यास जंगम मल्लिकार्जुनदेव त्यावेळीं काशींत कोठें होते ? हा प्रश्न लगेच पुढें येणार. ते शीलवंतनायकाबरोबर दक्षिणदेशांतून आले म्हणावे तर त्याला प्रमाण नाहीं. तसें असते तर मठ बांधून आपल्या शिष्यानां तेथें ठेवल्याचे विस्तार पूर्वक लिहिणाऱ्या लिंगण्णाकवीनें तसें लिहिले पाहिजे होते. दक्षिण देशांतून बोलावून आणलेल्या मल्लिकार्जुनदेवानां पट्ट बांधला असें कांहीं त्यानें लिहिले नसल्यामुळें मल्लिकार्जुनदेव हे काशीपीठाचे आधिकारप्राप्त पूज्यशिष्य व तपस्वीच असल्यामुळें त्यांचा पट्टाभिषेक महोत्सव झाल्यावर त्यांच्या सेवेस आपले शिष्य देऊन आपण या महापीठाच्या सान्निध्यांत लिंगैक्य पावून धन्य झाला असेल एवढेंच. या शिवाय श्रीविश्वाराध्यपीठच्या शीलवंत नायकाचें कालांत स्थापन झाले असें कांहीं होत नाहीं. तें युगे युगे चालत आलेले महापुरातन पीठ आहे असें अनेक आधार देऊन वर दाखविलेलेच आहे.

शीलवंत नायकानां वापरण्यांत आलेल्या विशेषणावरून ते थोर पुरुष होते हें उघड होत असले तरी ते जंगम ( माहेश्वर ) कुलाचेच होते असें सांगतां येणार नाहीं. त्यांच्या शीलवंत नांवावरूनच ते भक्तवर्गांतील होते ही निश्चित गोष्ट होय. म्हणूनच सुपाचे पंख लावून आकाशांत उडून दाखवून त्यानें चमत्कार केला असला तरी तो व त्याचे शिष्य विश्वाराध्यपीठाच्या पट्टाधिकाराचे बाबतींत आशा न धरतां जंगममूर्ति श्रीमल्लिकार्जुनदेवानांच

त्या पीठाचे अधिकार देऊन वर्णाश्रम धर्माचें त्यानें पालन केले असेंच म्हटले पाहिजे. असे असले तरी शीलवंत नायकाचा विषय तेराशे वर्षापूर्वींचा असल्यामुळें अलीकडील लिंगण्णाकवीनें केळदिनृपविजयांत त्याची कथा दंतकथेवरूनच रचलीं हें स्वाभाविकच आहे. म्हणून या बाबीला आपण विशेष महत्व देण्याचें कारण नाहीं. कारण खुद्द श्रीविश्वाराध्यपीठाचे मठांत शीलवंत नायकाच्या नांवाचा मागमूसही कोठें दिसून येत नाहीं. काशीचा राजा जयनंददेव याच्या दानपत्रांशींहि शीलवंताचा कांहीं संबंध नाहीं. उलट श्रीमल्लिकार्जुन देवानींच विशेष महिमा दाखविल्यामुळें त्यांच्या शुभाशीर्वादानेंच काशीनरेशाला संतति झाली म्हणून भक्तिपूर्वक **जंगमपुर** नामक आग्रहार त्याने दान दिला असेंच काशीक्षेत्रांत सर्वत्र प्रसिद्ध आहे. म्हणून लिंगण्णा कवीचें लिहिणें साधार व समंजसपणाचे नाहीं ही गोष्ट निश्चित होय.

वेळगांवचा गुरुलिंगप्पा "कुदर्शन" मध्यें लिहितो "कलिकेत ब्रह्मय्या नांवाचे शिवशरण बसवाच्या काळचे होते त्यानांच शीलवंतनायक असेंहि एक नांव होते त्यानेंच काशी मठ स्थापला. विश्वाराध्यपीठ बसवकालींच उत्पन्न झाले. श्री मरी तोंटदार्यकृत वीरशैवानंदचंद्रिकेच्या दहाव्या प्रकरणावरून हें सिद्ध होते" वगैरे याच्या या रडगाण्याचा थोडा विचार करावयास पाहिजे.

बसवाचें वर्णन करणाऱ्या पुस्तकांमध्यें तेलगु भाषेंतील बसवपुराणच सर्वांत प्राचीन आहे. त्याच्या पांचव्या आश्वासामध्यें कलिकेत ब्रह्मय्याचें वर्णन आले आहे त्यावरून तो पायांत घुंगुरु बांधून चोळी लेवून व हातांत बोकडाचें शिंग घेऊन नाचून जंगमांची करमणूक करणारा शिवभक्त होता एवढेंच कळते. भामकवीच्या कानडी बसवपुराणांत पांचव्या कांडांत याच वर्णनाचा अनुवाद केलेला आहे. कै० **श्रीमंत अप्पासाहेब वारदांनीं** छापलेल्या हेलापूर बसवकवीच्या संस्कृत बसवपुराणाचे एकोणतिसावे अध्यायांत सुद्धां कलिकेत ब्रह्मय्या विनोदी वेष धारण करून शिवभक्तांची करमणूक करीत असें असें स्पष्टच म्हटलेले आहे. तेव्हां कलिकेत ब्रह्मय्या बहुरूप्यांच्या वंशांतील असावा असें वाटतें ( ही जात अद्यापहि "किळि-

केतरू" या नांवानें कर्नाटकांत प्रसिद्ध आहे. ) शिवाय त्याला शीलवंतनायक हें दुसरें नांव असल्याबद्दल किंवा त्यानें काशीला एक मठ स्थापन केल्याबद्दल 'बसवराजरगळे,' चन्नबसवपुराण, प्रभुलिंगलीला, शिंगिराजपुराण वगैरे विरक्त पंथाच्या कोणत्याहि पुस्तकांत उल्लेख नाहीं. त्याचप्रमाणें कलिकेत ब्रह्मय्या हे प्रसिद्ध नांव सोडून शीलवंत नायक हे अप्रसिद्ध नांवच केळदिनृप-विजयांत सर्वत्र लिहिण्याचा असा कठिण प्रसंग काय होता ? काशीला आलेला शीलवंत नायक कल्याणांतील कलिकेत ब्रह्मय्या मुळींच नव्हे. या दोन्ही व्यक्ति भिन्न भिन्न काळीं भिन्न भिन्न झाल्या असल्या पाहिजेत हें निश्चित होय.

वीरशैवानंदचंद्रिकेच्या दहाव्या प्रकरणांत कलिकेत ब्रह्मय्याला शीलवंत हें दुसरें नांव दिले म्हणून काशीक्षेत्रांत मठ स्थापन केलेला शीलवंत नायक हाच होय असें बेळगांवचा गुरुलिंगप्पा लिहितो तेव्हां त्याचा कुटिलपणा किती विलक्षण आहे तो पहा. इ० स० सतराव्या शतकांत मरितोंटदार्यांनीं रचिलेला **वीरशैवानंदचंद्रिका** हा ग्रंथ अजून छापलेलाहि नाहीं. या ग्रंथाची हस्तलिखित प्रत म्हैसूर गव्हर्न्मेंट लॅयब्ररींत आहे. त्या ग्रंथाच्या दहाव्या प्रकरणांत कलिकेत ब्रह्मय्या संबंधीं खालील श्लोक आहे.

'कलिकेत ब्रह्मनाम्ना पुरा शीलवता स्फुटम् ।
स्थापितं..........प्रमथानां सभान्तरे ॥
विद्वद्वर्य त्वया प्रोक्तमष्टावरणवैभवम् ।

म्हणजे "हे पंडिता, प्राचीन काळीं प्रमथांच्या सभेंत शीलांचें पालन करणाऱ्या कलिकेत ब्रह्मय्याकडून विशदरीतीनें प्रस्थापित केलेला अष्टावरण विषय तूं उत्तम तऱ्हेनें सांगितलास" असा सरळ अर्थ आहे. पण **शीलवता** या शब्दाचा अर्थ गुरुलिंगप्पानें **शीलवंत नायक हें दुसरें नांव असलेला** असा केला आहे. गुरुलिंगप्पाच्या मुसलाग्रबुद्धीचेंच हें एक ठळक उदाहरण आहे. अरेरे ! विचाऱ्याचें दुर्दैव ! त्याला कोण काय

करणार ! " **काशी गमनमात्रेण नान्नंभट्टायते द्विजः ।"** या आर्योक्ति प्रमाणें केवळ काशीक्षेत्राला गेल्यामुळें सर्वांनां संस्कृत पांडित्य येते असें नाहीं. श्रमपूर्वक अध्ययन केल्याशिवाय शब्दांचा मनाला वाटेल तसा अर्थ केला तर तो कांहीं विद्वानानां सम्मत होणार नाहीं. किंवा गुरुलिंगप्पानें दुसऱ्या एखाद्या दीडशहाण्याच्या सांगण्यावरून वरील प्रमाणें लिहिले कीं काय कोणास ठाऊक ! असो. हे दुर्बुद्धे ! **शीलवता** हा शब्द **कलिकैतब्रह्मनाम्ना** या शब्दसमुच्चयाचें विशेषण आहे. त्याचा एकंदर अर्थ **आचारसंपन्न असा कलिकैत ब्रह्म** हा आहे. या शीलवता शब्दाशीं केळदि नृपविजयांतील शीलवंत नायक शब्दाचा कोणताहि वादरायण संबंध नाहीं एवढी गोष्ट अल्पस्वल्प संस्कृत कानावर पडलेल्या धनगरालाहि कळण्याजोगी आहे.

वीरशैवानंदचंद्रिकेचे लेखक मरितोंटदार्य विरक्त असले तरी धर्मशास्त्रज्ञ असल्यामुळें श्रीजगद्गुरु पंचाचार्यांचे बाबतींत त्यानां बरीच श्रद्धाभक्ति होती. **सिद्धान्तशिखामणि** या ग्रंथाला त्यांनी **तत्त्वदीपिका** नामक संस्कृत टीका लिहिली आहे ही गोष्ट प्रसिद्धच आहे. हा ग्रंथ पन्नास वर्षांपूर्वी ( तारण शा० श० १८०६ ) **मैसूरच्या वीरसंगप्पा** कडून व नंतर अप्पासाहेब वारदाकडून छापलेला आहे. या ग्रंथांत गुरुकारुण्यस्थलाच्या एकोणिसाव्या श्लोकावर टीका लिहितानां ' **ऋत्विग्भिः** ' या शब्दाला ' **भुवनप्रसिद्धपंचाचार्यसंप्रदायानुगैः** ' असें भाष्य त्यांनीं लिहिले आहे. त्याच प्रमाणें ' **आचार्यः** ' या पदावर त्यांनीं ' **तत्सम्प्रदाय एव आचार्यपट्टाभिषिक्तः** ' असें स्पष्ट भाष्य केलेले आहे. म्हणजे शिव दीक्षेच्या वेळीं **पंचकलशस्थापन** केल्यावर जगत्प्रसिद्ध पंचाचार्यांच्या गोत्रजानांच ऋत्विज म्हणून स्वीकारावे व शिष्योपदेश करणारे गुरु अवश्यमेव पट्टाधिकारीच असले पाहिजेत असें निर्बुद्धानांहि कळेल अशा स्पष्ट रीतीनें त्यानीं लिहिलें आहे. यावरून मरितोंटदार्यांना पंचाचार्यांपैकीं श्रीजगद्गुरु विश्वाराध्यांची चांगली माहिती असली पाहिजे हें उघड होते. या प्रमाणें पंचाचार्य भक्त असलेले मरितोंटदार्य आपल्या एका ग्रंथांत अनादिसिद्ध

श्री विश्वाराध्यांचे स्मरण करून दुसऱ्या ग्रंथांत तद्विरुद्ध विषय लिहितील असें कधींहि होणार नाहीं, व तसें त्यांनीं केलेहि नाहीं. पंचाचार्यभक्त मरितोंटदार्यावर गुरुद्रोहाचा आरोप एखादा दुर्विरक्त करीत असेल तर त्याला परशिव योग्य शासन दिल्याशिवाय कधींच राहणार नाहीं.

येथवर उल्लेख केलेल्या **स्वायंभुवागम, यजुर्वेदवीरलैंग्योपनिषत्, नारायणोपनिषच्छैवभाष्य, शिवाद्वैतपंचक, सिद्धान्तशिखामणि, वीरशैवाचारप्रदीपिका, वीरशैवसदाचारसंग्रह** वगैरे महाग्रंथावरून जयनंददेव महाराजाच्या दानपत्रावरून काशीक्षेत्रांत श्रीजगद्गुरुविश्वाराध्यपीठ फार प्राचीन काळापासून अचलपणें आहे असेंच निश्चित होते. म्हणूनच श्री विश्वाराध्यांच्या स्कंदगोत्राचे कित्येक शाखामठ महाराष्ट्र, आंध्र, कर्नाटक प्रांतांत इल्लीं सुद्धां विराजमान आहेत. अशा शाखामठापैकीं बेळगांव जिल्ह्यांतील हूली ( पूवलि ) गांवचा पंचवर्णबृहन्मठ इ० स० च्या पांचव्या शतकापेक्षांहि पूर्वींचा आहे असें इतिहासानेंच सिद्ध झालेले आहे. ( " शिवानुभव " मासिक वर्ष २ रें अंक ३ रा० विजापूर पहा. ) शाखामठच इतके प्राचीन असल्यावर आद्यमठ श्रीविश्वाराध्यमहापीठ त्याहूनहि प्राचीन आहे हें कबूल करण्यास कष्टी होण्याचे मुळींच कारण नाहीं.

## जंगमवाडीमठाचा विचार.

लिंगण्णाकवीनें केळदिनृपविजयाच्या तिसऱ्या आश्वासांत केळदिवंशाचा तिसरा राजा दोड्डसंकण्णा नायक याचें चरित्र विशेष विस्तारानें लिहिले आहे. कवीच्या कल्पनाचातुर्याचें उदाहरण म्हणजेच हा तिसरा आश्वास ही गोष्ट न ओळखतां बेळगांवच्या गुरुलिंगप्पानें यांतील कल्पित वर्णन सत्यच मानून जंगमवाडी मठासंबंधी कांहीं तरी लिहून फसला आहे. प्रथम त्या प्रकरणाचा मुख्य विषय देऊन मग आम्ही त्यावर योग्य विमर्श करणार असल्यामुळें कुशाग्र वाचकांनीं सावधानपणें विचार करावा असें आम्ही सुचवून ठेवतो. लिंगण्णाकवी तिसऱ्या आश्वासांत खालील प्रमाणें लिहितो.

"शालिवाहन शके १४८६ मध्यें विश्वावसु संवत्सरांत राज्यसिंहासनावर आल्यानंतर कांहीं वर्षे पर्यंत दोड्डसंकण्णानायकानें धैर्यानें, नीतिधर्मानें, राज्यकारभार हांकल्यावर आपला धाकटाभाऊ, चिक्कसंकण्णा नायक यास राज्यकारभार देऊन आपण जंगमवेष धारण करून चार परिचारका-सह तीर्थयात्रेसाठीं रामेश्वरादि दक्षिणयात्रा करून दिल्लीस आल्यावर अंकुशखान नामक वजीराला खड्गयुद्धांत ठार मारून, दिल्लीच्या बादशहाला संतुष्ट केले. 'मला कांहीं ठिकाणीं जंगमासाठीं मठ बांधावयाचे आहेत, भूमि द्या' असें दोड्डसंकण्णा नायकानें म्हटल्यावर बादशहानें भूमि दिली. त्यानंतर दिल्लींत एक मठ बांधून जंगमानां दान केले व प्रयागक्षेत्रांत एक मठ बांधून तो जंगमानां देऊन संकण्णा नायक काशीक्षेत्रीं गेला तेथें फार पूर्वी पासून असलेला जंगममठ मुसलमानानीं बळकाविलेला पाहून संकण्णानें त्यांनां पळवून लावले व चारी बाजूस सीमालिंगें स्थापून त्या मठाला जंगमवाडी असें नांव दिले. त्या मठाला धर्मादाय म्हणून नैॠत्य दिशेकडील जंगमपुर गांव जहागीर दिले व दानशासन जंगममूर्तीनां करून दिले. त्यानें आणखी पांच मठ बांधून व प्रसिद्ध कारागिराकडून काशीक्षेत्रांतील कपिलधारा, मानससरोवर, गंधर्वसागर, वगैरे तीर्थें फरसबंदी करून दिली व कर्दमेश्वर, भीमचंडी वगैरे मंदिरांचा जीर्णोद्धार केला. आपला मुलगा वेंकटप्पानायकाचे नांवानें त्यानें शिलालेख कोरले, नंतर गया, नेपाळ व केदार वगैरे ठिकाणींहि मठ बांधून ते जंगमानां दान करून दक्षिणेंत परत आल्यावर शा० श० १४८१ मध्यें तो लिंगैक्य पावला."

यावर आमचें म्हणणें खालील प्रमाणें आहे. **"प्रथमग्रासे मक्षिका-पातः"** या म्हणी प्रमाणें शा० श० १४८६ मध्यें विश्वावसु संवत्सरांत दोड्डसंकण्णा नायक गादीवर आला असें जें लिंगण्णा कवीनें लिहिले आहे तें सोळा आणे खोटे आहे. कारण शा० श० १४८६ मध्यें कोणत्याहि गणित शास्त्राप्रमाणें विश्वावसु संवत्सर येत नाहीं. खुद्द त्यानें लिहिलेल्या इतरांच्या राज्याभिषेक दिनाशीं सुद्धां हा दिन जुळत नाहीं. याला हस्तदोष किंवा मुद्रण-दोष म्हणता येणार नाहीं. विचार न करतां ऐकीव बातमी त्यानें दडपून दिली

कीं काय कोणास ठाऊक ! येथें शालिवाहन शक १४६७ असें पाहिजे होते १४८६ नव्हे. हें गणित सामान्य विद्यार्थ्यांनांहि कळण्याजोगे आहे.

आतां दिल्लीच्या बादशहाचा मंत्री अंकुशखान याला दोड्ड संकण्णा नायकानें खड्गयुद्धांत मारल्याचे आणखी एक अद्भुत वर्तमान लिंगण्णा कवीनें लिहिले आहे. इतिहासज्ञ या गोष्टीला कपोलकल्पितच ठरवितील यांत मुळींच शंका नाहीं. दिल्लीचे बादशहाच्या इतिहासांत कोठेंच उल्लेख नसलेली ही गोष्ट आहे. म्हणून या गोष्टीचा विशेष विंचार करणें जरूर आहे. दोड्डसंकण्णा नायकानें इ० स० १५४७ पासून १५६० पर्यंत राज्य केले असें केळदिनृप-विजयावरूनच कळून येते. या मुदतींत तो काशीला केव्हां गेला तें कळत नाहीं. त्यावेळीं दिल्लीचा बादशहा कोण होता त्याचें नांव लिंगण्णा कवीनें दिले नाहीं. बाबर, हुमायून, शेरशहा, अकबर, जहांगीर, शहाजहान, औरंगजेब वगैरे प्रसिद्ध नांवें लिंगण्णा कवीला माहीत नव्हती असें नाहीं. कारण त्यानेच केळदिनृपविजयाच्या नवव्या आश्वासांत दिल्लीच्या सर्व बादशहांची नावें दिली आहेत. अर्थातच संकण्णा नायकानें अंकुशखानाबरोबर युद्ध केल्याचा विषय लिंगण्णा कवीच्या कल्पनेतलाच असला पाहिजे. युद्धकाल व बादशाहाचें नांव न देण्यांत त्यानें चेरकीपणाच केला आहे. तसें त्यानें तें दिले असते तर पुढील इतिहासकारानीं त्याची लबाडी उघडकीस आणली असती असा विचार त्यानें केलां. दोड्डसंकण्णा दिल्लीस अमक्या सालीं आला असें म्हणण्यास कांहीं प्रमाण नाहीं. तरी पण वेळगांवच्या गुरुलिंगप्पाचे कपोलकल्पनें प्रमाणें तो इ० स० १५५६ च्या सुमारास आला असें "**तुष्टतु दुर्जनः**" या न्यायास अनुसरून मानले तर त्याच सालीं जानेवारी महिन्याच्या सत्तावीस तारखेस हुमायून बादशहा मेला. त्यानंतर त्याचा मुलगा अकबर गादीवर आला असला तरी त्याचा पालक बहिरामखानच राज्यकारभार चालवीत होता. म्हणजे इ० स० १५५५ पासून १५५७ पर्यंतचे दिवस मोंगल साम्राज्याला फार वाईट गेले. त्यावेळीं दिल्लींत वजीराचे हुद्यावर कोणीच नव्हते. त्यापूर्वीं म्हणजे १५४० पासून १५४५ पर्यंत दिल्लीचे आक्रमण केलेल्या शेरशहाच्या आणि पुढें १५५[illegible] पर्यंत असलेल्या त्याच्या

मुलाच्या कारकीर्दीत अंकुशखानाच्या नांवाचा मागमूसहि नाहीं. ( पहा, "Shershah" By qonugo. ) हुमायून बादशहाची बहीण **गुलबदन बेगम** हिचा **'हुमायूनामा'** ग्रंथ, त्याच काळीं होऊन गेलेल्या **जौहरचा 'वाकेयाते हुमायूनी'** हा ग्रंथ, हे फारसी भाषेंत लिहिलेले आहेत हे व इतर ग्रंथ पाहिले तरी त्यावेळीं अंकुशखान नामक वजीर किंवा सेनापति असल्याचे मुळींच आढळून येत नाहीं.

त्यावेळीं हुमायूनाच्या दरबारांत **बहिरामखान, ख्वाजामुअज्जम, ख्वाजानियाजी, नदीमकोका, हाजीमहंमदखां, बाबादोस्त बख्शी, मिर्झाकुलीबेगचूली, इब्राहिमएषक आगा, हसनअली एषकआगा, याकुबकोर्ची, अंबरनाजर, मुलकमुख्तार, संवर-मोरहजार, ख्वाजाकेसक** वगैरें मात्र होते. अकबराचे काळीं **राजा-तोडरमल, बीरबल्ल,** मानसिंग वगैरे असल्याचे प्रसिद्धच आहे. लिंगण्णा-कवीनें लिहिल्या प्रमाणें अंकुशखान नामक व्यक्ति वजीर म्हणून प्रसिद्ध असती तर मोंगल इतिहासांत तें नांव बहिष्कृत होण्याचे कांहींच कारण नाहीं. पण अंकुश हा शब्दहि मुसलमानी भाषेंतला नसून संस्कृत भाषेंतील आहे. लिंगण्णाकवीनें केळदिनृपविजयांत अनुप्रास साधण्यासाठीं अंबरखान, अंकुशखान, मंजुलखान, संजरखान, सर्जाखान भर्जाखान वगैरे अनेक कल्पित संस्कृत नांवें वापरल्याचे दिसून येते ( केळ० नृ० पान ७२ पहा ) एक्काहत्तर पानांत आणखी एका अंकुशखानाचें नांव त्यानें दिलेले आहे. म्हणून दोड्ड संकण्णानें दिल्लीला जाऊन वजीर अंकुशखानाला मारल्याची हकीगत सफशेल खोटी म्हणून हात वर करून सांगण्यास हरकत नाहीं. आपल्या राजांच्या प्रतापांत रमणीयता आणण्यासाठीं लिंगण्णा कवीनें ही कल्पित हकीकत दिली असल्यामुळें सत्य इतिहासाच्या दृष्टीनें तिला कवडीचीहि किंमत नाहीं.

दोड्डसंकण्णा नायकानें दिल्लीला मठ बांधल्याची हकीकत सुद्धां ऐतिहासिक प्रामाण्य व अनुभवप्रतीति या दोन्ही दृष्टीनें विश्वासार्ह ठरत नाहीं. वरील सर्व गोष्टींचा विचार करूनच केळदिनृपविजयाच्या पूर्व पीठिकेंत

ए० आर० कृष्णशास्त्रींनीं "दोड्डसंकण्णांनीं दिल्लीस जाऊन अंकुशखानाला मारल्याची कथा कल्पित आहे" असें स्पष्ट लिहिले. तरी पण असला असंबद्ध विषयच मुख्य समजून व तोच खरा इतिहास आहे असें वडवडत 'दोड्ड संकण्णा नायकानें दिल्लीस जाऊन युद्ध करून भूमि मिळविली व उत्तर देशांत ठिकठिकाणीं मठ बांधून ते त्यांच्या बरोबरच आलेल्या जंगम यात्रेकरूनां दान दिले' असें निराधारपणें लिहि-णाऱ्या भ्रांतिरोगग्रस्त विरक्त पोराला वरील प्रमाणें चिकित्सानिदान सांगावे लागले.

आतां मद्रास-मुद्रित शिवतत्त्वरत्नाकरांतहि अंकुशखानाबरोबर खड्गयुद्ध झाल्याचा अप्रासंगिक विषय आला आहे. ( शिव० तत्त्व० पान १३६ पहा ) पण त्यांत दिल्ली, काशी, गया वगैरे ठिकाणीं मठ बांधल्याचा व जंगमवाडीचा विषय तेवढा आलेला नाहीं "दिल्लीश्वराकडून मिळविलेली भूमि ईश्वराप्रीत्यर्थ काशीक्षेत्रीं देण्यांत आली एवढें मात्र लिहिलेले आहे. पण जंगमाप्रीत्यर्थ असें कांहीं लिहिलेले नाहीं. केळदिनृपविजयांत दोड्डसंकण्णा नायक "प्रथम-दिल्लीस जाऊन नंतर केदार, काश्मीर वगैरे यात्रा करून काशीक्षेत्रीं आला" असें लिहिले आहे. पण शिवतत्वरत्नाकरांत "प्रथम केदार काश्मीर वगैरे पाहून दिल्लीवरून काशीला आला" असें आहे. हा परस्पर विरोध पाहिला म्हणजे मुख्य गोष्ट विचारांत घेण्याची ही कीं, शिवतत्त्वरत्नाकराची आणखी एक प्राचीन प्रत म्हैसूर गव्हर्न्मेंट ओरियंटल लॅयब्ररींत आहे. त्यामध्यें केळदि घराण्यांच्या राजांचा व दोड्डसंकण्णानायकाचा विषयच आलेला नाहीं. ( पहा केळदिनृपविजय पूर्वपीठिका पान ९ ) यावरून शिवतत्त्वरत्नाकरांत अगदीं अलीकडे या लिंगण्णा कवीनें किंवा आणखी कोणी तरी संकण्णा संबंधी श्लोक रचून घुसडलेले दिसतात. एरव्ही त्या ग्रंथाचा कर्ता बसवप्पा नायक तसें कधींहि लिहिणार नाहीं. कदाचित त्यानेंच तें लिहिले असले तरी अंकुशखाना-बरोबरचे युद्ध मात्र अगदींच खोटे ही गोष्ट त्रिकालाबाधित होय.

केळदिनृपविजयांत "काशीमठावर मुसलमानानीं आक्रमण केले असतां

तो दोड्डसंकण्णानें सोडविला" अशी सर्वस्वी खोटी गोष्ट लिहिली आहे. ह्या संकण्णानायक उत्तर हिंदुस्तानांत येण्यापूर्वी एकोणीस वर्षे म्हणजे इ० स० १५३७ मध्यें **हुमायून** बादशहानें चुनार नगरचा किल्ला सर करून काशीक्षेत्रीं आगमन केले असतां जंगमवाडीमठाच्या त्यावेळच्या अधिकाऱ्यानीं मोठ्या वैभवानें **अग्निस्तंभन** ( किंवा दक्षयज्ञध्वंस ) करून दाखविल्यामुळें खुष होऊन त्यानें चुनारची तीनशें ३०० विघे जमीन मठाला दिली व धर्मकार्य शाश्वत चालावे म्हणून **दानपत्र** ( फर्मान ) करून दिले आहे. अर्थात काशीक्षेत्रीं असलेल्या मठ मंदिरावर त्यावेळीं मुसलमानानीं आक्रमण केलेच नाहीं त्या नंतर सुद्धां **अकबर, जहांगीर, शहाजहान, औरंगजेब,** व **महमदशाह** या प्रसिद्ध बादशहांनीं अत्यंत श्रद्धेनें जंगमवाडीमठाच्या देणग्या वाढवून त्या कायम राखल्याची फर्मानें लिहून दिलेली आहेत. काशीपीठाच्या आधीन असलेल्या गया (शिशोरिया मोहल्ला) प्रयाग (दारागंज) वगैरे ठिकाणच्या जंगमवाडीमठांना भूदान मिळालेले आहे. जंगमवाडीमठांत मोंगलांची जवळ जवळ दीडशे फर्मानें असून ती अनेक कोर्टांनीं प्रमाण मानली आहेत. परवाच्या खटल्यांत तर सबजज्जांनीं त्यांचें सूक्ष्म परीक्षण करून त्याचे महत्व मुक्तकंठानें प्रशंसिले आहे (मैसूर पंचाचार्यप्रभा ता० १८।१२।३३ चा अंक पहा ) **बनारस गॅझेटिअरच्या** १२३ व्या पानांतहि या दानासंबंधीं उल्लेख आहे. सुप्रसिद्ध **डॉ० बाबू भगवानदास एम्. ए.** यानीं "हंस" मासिकाच्या **काशीअंक** नामक विशेष अंकांत जंगमवाडी मठाला मोगल बादशहांनीं दिलेल्या दानपत्रांचा उल्लेख करून मठाच्या गुरूंची प्रशंसा केली आहे. औरंगजेबाच्या नंतर मात्र मुसलमान सत्ताधाऱ्या-कडून इनामजमिनी व शेतसाऱ्यासंबंधीं थोडी भानगड उपस्थित करण्यांत आली होती. यापलीकडे 'मठच मुसलमानानीं आक्रमिला होता' असें लिंगण्णा कवीचें लिखाण सर्वस्वी खोटे आहे. अर्थातच तो दोड्डसंकण्णा नायकानें सोडविला व चारी बाजूस त्यानें सीमालिंगारोपण केले ही गोष्ट आकाशकुसुमा-इतकीच खोटी आहे. सीमा दाखविणारे दगड जंगमवाडीतील रस्त्यावरून सुद्धां कोठेंहि नाहींत.

जंगमगाटी ( वाडी ) हें नांवच संकण्णा नायकानें ठेवले असेंहि एक चमत्कारिक विधान आहे. "काशीमठाचे पट्टाधिकारी जंगममल्लिकार्जुनदेव बऱ्याच काळापूर्वी झाले असून हा मठ बराच विस्तीर्ण होता. त्यांत अनेक खांब होते. मध्यस्तंभाजवळ शीलवंतनायक योगारूढ होऊन अंतर्धान पावले" वगैरे वर्णन विस्तार पूर्वक लिहून लिंगण्णाकवीनें त्या मठाचें नांव मात्र कां लिहिले नाहीं ? ( के० नृ० वि० पान ५९ ) त्या मठाला बराच काळ लोटला तरीहिं त्याला नांवच नव्हते काय ? नुसते मठ हेंच नांव होते म्हटल्यास काशीक्षेत्रीं त्याकाळीं आणखी मठ नव्हते काय ? ते असतील तर काशींतील हा आदिमठ कीं काय ? तर मग जंगमवाडीमठांत इतके कागद पत्र असून त्यांतील एकांतहि आदिमठ असा कां उल्लेख नाहीं ? **श्रीविश्वाराध्यमठ, श्रीविश्वाराध्यमहासंस्थान, ज्ञानसिंहासन,** वगैरे नांवेंच कां प्रचारांत आहेत ? असाच विचार करीत गेल्यास तो किती तरी वाढेल. तात्पर्य हें कीं, दोड्ड संकण्णानायकानें जंगमवाडीमठ हें नांव ठेवले ही गोष्ट कधींच सिद्ध होणार नाहीं.

आतां मठाच्या बांधणीचा विचार करूं—श्री जगद्गुरु विश्वाराध्यांची तपोभूमि ( गादीस्वामी ) आणि कैलासमंटप अनादि कालापासून विराजत आहेत. काशीनरेश **जयनंद देवानें** आपल्या कालांत ( विक्र० सं० ६३१, किंवा इ० स० ५७४ ) मठ विशेष रीतीनं बांधून कर्दमेश्वर गंगानदीच्या मध्यभागीं जंगमपुर ( जहागीर गांव ) नामक अग्रहार समर्पण केला आहे. हल्लीं मठांत दिसत असलेल्या चित्रकमरा, गणेशभवन, गोशाला, अन्नछत्र, वगैरे इमारती श्रीजगद्गुरु हरीश्वरस्वामीचे गुरु श्रीशिवलिंग महास्वामी यांचे कारकिर्दीमध्यें बांधल्या गेल्या आहेत ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. तेव्हां केळदिघराण्याचा राजा संकण्णा नायक याने "अति मनोहर मठ" कोठें बांधला याचा कितीही विचार केला तरी ती गोष्ट असंबद्धच वाटते, असा मोठा मठ त्यानेंच बांधला असता तर मठाच्या कागदपत्रांत किंवा इकडील लोकांचे सांगण्यांत कांहीं तरी आले असते, पण तसें कांहींच दिसत नाहीं व तसा शिलालेख तर मुळींच नाहीं.

श्रीविश्वाराध्यपीठाच्या जागे भोंवती पूर्वी एक मोठें वन होतें. त्यालाच पीठाधिकाऱ्यानीं जंगमवाटिका असें नांव ठेवले होते. कालांतरानें काशी-वासियानीं या जंगमवाटिकेंत घरें बांधिली. तेव्हा मठाला जंगमवाडी ( वाडी म्हणजे राजवाड्या सारखी मोठी इमारत ) असें लोक म्हणूं लागले. काशीक्षेत्रांत जंगमवाडीप्रमाणेंच आंग्रेवाडी, ग्वालेरवाडी, जमखंडीवाडी वगैरे नांवेंहि हिंदुस्तानी पद्धती प्रमाणें रूढ आहेत. म्हणून केळदि राजांच्या काळीं मठाला जंगमवाडी हें नांव दिले गेलें ही गोष्ट मात्र सर्वस्वी खोटी होय. दोड्ड संकण्णा नायकाचे पूर्वी १९ वर्षें म्हणजे इ० स० १५३७ मध्यें हुमायून बादशहा काशीक्षेत्री आला असतां मठाला जंगमवाडी म्हणत असत. लोकांचे व्यवहारांत तेंच नांव आल्यामुळें स्वाभाविकपणें तेंच विशेष प्रचारांत आहे. पण हें नांव कोणी ठेवलेले नांहीं. या मठाचें योग्य नांव श्रीविश्वाराध्यमठ किंवा विश्वाराध्य महासंस्थान हेंच होय. या जंगमवाडी महामठांत कोडगु ( कूर्ग ), मैसूर, रीवा, मैहर, काशी वगैरे देशांच्या राजांची व मुसलमान बादशहांची किती तरी दानपत्रें व शिलालेख आहेत. पण केळदिराजांची नांवनिशाणी सुद्धां नाहीं. कोणत्याही दृष्टीनें विचार केला तरी **जंगमवाडीमठाच्या बांधणाशीं केळदिवंशाचा राजा दोड्ड-संकण्णानायक याचा काडीइतकाहि संबंध नाहीं.** म्हणून लिंगण्णाकवीनें लिहिलेला वृत्तांत कपोलकल्पित होय, असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं.

संकण्णानायकानें तर काशीक्षेत्रांत पांच मठ बांधले म्हणून लिंगण्णाकवी लिहितो. ते आकाशांतील सशाच्या शिंगाप्रमाणेंच आहेत कीं काय तें देवच जाणे. काशीपंचक्रोशीच्या यात्रेंत अनेक तीर्थें संकण्णानायकानें बांधली व अनेक मंदिरांचा जीर्णोद्धार केला असें लिंगण्णाकवीनें लिहिलेले पाहून फार आश्चर्य व विषाद वाटतो. कोणाचे ऐकून त्यानें असें लिहिलें तेंहि कळत नाहीं. पंचक्रोशींत असलेले पहिले मुक्काम म्हणजे कर्दमेश्वर क्षेत्रांत कर्दमेश्वर मंदिर व कर्दमतीर्थ होय. त्याचा जीर्णोद्धार बंगालदेशच्या भवानीराणीनें

शा० श० १६७६ म्हणजे इ० स० १७७५ मध्यें करून तसा शिलालेख करून ठेवला आहे. त्यापूर्वी हजारो वर्षे हे तीर्थ पडिकच होते. दोड्डसंकण्णानायकानेंच तें इ० स० १५५६ मध्यें बांधले असते तर त्याला पडिक कसें म्हणतां येईल ? शिवाय त्याचा शिलालेख किंवा लोकवार्ता वगैरे कांहींच नाहीं. कर्दम कुंडाच्या पायऱ्याजवळ भवानीराणीचा शिलालेख खालील प्रमाणें आहे—

शाके गोत्रतुरंगभूपतिमिते श्रीमद्भवानीनृपा ।
गौडाख्यातमहीमहेंद्रवनिता निष्कर्दमं कार्दमम् ॥
कुण्डं ग्रावसुखण्डमाण्डिततया काश्यां व्यधादादरात् ।
श्रीतारातनयाःपुरान्तकपरप्रीत्यै विमुक्त्यै नृणाम् ॥

भीमचंडी नामक दुसऱ्या ठिकाणीं 'गंधर्वसागर' नामक एक तीर्थ आहे. तें तर पूर्णपणें मुजून गेले होते तें पुन्हा खोदवून चारी बाजूस पायऱ्यांचे उत्तम घाट भवानी राणीनेंच बांधविले आहेत. तेथें सुद्धां केळदिराजांचें कांहींच चिन्ह नसल्यामुळें लिंगण्णाकवीनें जें लिहिले तें सर्व कपोलकल्पित होय हें निराळे सांगण्याची जरूरी नाहीं. चंडिकेश्वरमंदिराजवळ राणीभवानीचा शिलालेख अजूनहि आहे तो खालील प्रमाणें—

शाके का⋯⋯गभूपे गतविलकमलं गौडराजस्यपत्नी ।
गन्धर्वाम्भोधिमम्भोनिधिसमखननत्स्वर्गसोपानजुष्टम् ॥
चक्रे राज्ञी भवानी सुकृतमतिकृति भीमचण्डीसकाशे ।
काश्यामस्याः रसुकीर्तिः सुरपतिसामितौगीयतेनारदाद्यैः ॥

वरील सर्व बाबो विचारांत घेतां काशीक्षेत्रीं किंवा पंचक्रोशींत केळदि दोड्डसंकण्णा नायकाचा कांहींहि सबंध दिसत नाहीं. त्यानें काशीहून नेलेले एक लिंग त्यांकरप्पा नायकानें स्थापन केले असं

केळदिनृपविजय पान ८२ मध्यें म्हटले आहे. पण तेंहि खरें दिसत नाहीं कारण दोड्डसंकण्णानायकानंतर गादीवर आलेल्या चिक्कसंकण्णा नायकानें व रामराजनायकानेंच तें स्थापन केले असते, व्यंकटप्पानायक गादीवर येईपर्यंत तें तसेंच पडून राहण्यास काहींच कारण नव्हते.

दोड्डसंकण्णानायकाचें अंकुशखाना बरोबरचें युद्ध त्याची जंगमवाडीमठाची बांधणी वगैरे खोट्या गोष्टी लिहून लिंगण्णा कवीनें चुकीचा मार्ग पत्करला हें येथवर सप्रमाण सिद्ध केले आहे. पण हें सर्व दोष सामान्य म्हणून क्षमा करतां येतील तथापि **या सर्व दोषानां मूलकारण असलेली चूक हिमालया एवढी मोठी आहे.** ती मात्र कोणत्याहि कारणास्तव क्षम्य ठरणार नाहीं. ती चूक अशी.

" दोड्डसंकण्णा नायकानें काशीक्षेत्रातील पंचक्रोशी यात्रेपैकीं पांचवें कपिलधारातीर्थं फरसबंद बांधवून आपला मुलगा वेंकटप्पा नायकाच्या नांवानें त्यानें शिलालेख करविला आहे " असें केळदिनृपविजयाच्या ६० व्या पानांत म्हटले आहे. पण शिलाशासनासंबंधींच थोडा विचार केल्यास लिंगण्णाकवीला असली आकाशकुसुमें निर्माण करण्याचें हि कारण नव्हते असेंच दिसून येईल. कपिलधारा तीर्थ स्वतः बांधून संकण्णा नायकाला व्यंकटप्पा नामक आपल्या मुलाच्या नांवानें शिलालेख करण्याचें मुळींच कारण नव्हते. असली धर्मकार्यें केलेल्या कोणीहि शिष्टानें असा प्रकार केलेला नाहीं. ज्यानें त्यानें आपआपलेंच नांव कोरलेले आहे. म्हणून दोड्डसंकण्णानायकानें जर कपिलधारा तीर्थ बांधले असते तर त्यानें आपलेंच नांव खास कोरले असते. परन्तु पाप ! **तसें त्यानें तें बांधलेहि नाहीं व मुलाच्या नांवानें शिलालेख केलाहि नाहीं.** " हुलियू बंदिल्ल हुलियबालवू कंडिल्ल " या कानडी म्हणी प्रमाणें म्हणजे " वाघ आलाहि नाहीं व वाघाचे शेंपुट पाहिलेहि नाहीं " या दोन्ही गोष्टी अगदीं निराधार आहेत. लिंगण्णाकवीनें हें सर्व मूर्खपणानें लिहिले असो, किंवा दंतकथेवरून लिहिले असो. असलें धाडस इतिहासाचा कोणीहि भक्त करणार नाहीं यांत शंका नाहीं. या सर्व प्रकारांतील खरें मर्म जाणण्यासाठी

खालील विषयाकडे वाचकांनीं सावधान चित्तानें लक्ष द्यावें.

काशीक्षेत्राजवळील कपिलधारातीर्थावर केळदिवंशाच्या राजानीं केलेला शिलालेख अजून उत्तम स्थितींत आहे. संस्कृत, तेलगु, कानडी, हिंदी व फारसी या पांच भाषेंत लिहिलेले पांच शिलालेख कपिलधारातीर्थाच्या पश्चिमबाजूस आहेत. त्यांत खालील प्रमाणें कोरलेले आहे.

**॥ श्री स्वस्ति श्रीविक्रम शक १७१२ शालिवाहन शक १५७७ मध्यें केळदि सदाशिवनायकांचे पणतू, संकण्णानायकाचे नातू, सिद्प्पा नायकाचे मुले शिवप्पानायक आणि व्यंकटप्पा नायक यानी कपिलधारेंत हें तीर्थ बांधले ॥**

म्हणजे केळदि वंशाचे ( १ ) चौडप्पा शालीवाहनशक १४२२ ते १४३६, ( २ ) सदाशिवराय शके १४३६ ते १४६८, ( ३ ) दोड्डसंकण्णा १४६८. ते १४८१ ( ४ ) चिक्कसंकण्णा १४८१ ते १४९३. ( ५ ) रामराजा १४९३ ते १५०५ ( ६ ) व्यंकटप्पा १५०५ ते १५५२ ( ७ ) वीरभद्रप्पा १५५२ ते १५६८ ( ८ ) शिवप्पा. १५६८ ते १५८३ व ( ९ ) व्यंकटप्पा शके १५८३ ते १५८४ या प्रमाणें नऊ राजे क्रमानें राज्य करते झाले. तिसरा-राजा दोड्डसंकण्णा काशीला मुळींच आला नाहीं. परंतु त्याच्या नंतर एकशेंदोन वर्षांनीं गादीवर आलेला शिवप्पा नायक शके १५७७ मध्यें आपला भाऊ व्यंकटप्पा नायकासह काशीक्षेत्रीं आला व त्यानें कपिलधारातीर्थ बांधून वरील शिलालेख केला आहे. यानें जर जंगमवाडीमठाच्या गुरूनां विशेषदान दिले असते तर कपिलधारातीर्था प्रमाणेंच जंगमवाडीमठांत सुद्धां त्यानें शिलालेख केला असता. तसा शिलालेख नसल्यामुळें **केळदिराजांचा जंगमवाडी-मठाशीं कांहीच संबंध नाहीं हें उघड आहे.** सुप्रसिद्ध श्रीविश्वाराध्य सिंहासनमठ प्राचीनकाळापासूनच जंगमांचें वासस्थान असल्यामुळें जंगमवाडी म्हणून हा मठ प्रसिद्ध आहे. त्याच प्रमाणें गया प्रयाग वगैरे क्षेत्रीं श्रीविश्वाराध्यमठाचे अधिकारी मठ स्थापून मठाधिकृत्यें करीत आले असल्यामुळें तेथील जंगमवाडी मठ सुद्धां प्रसिद्धीस आले. सारांश **उत्तर हिंदुस्तानांतील**

जंगम व जंगममठ अनादिकालापासूनचेच आहेत. दोड्डसंकण्णा नायकानें बांधलेले नाहींत असाच इतिहासचा सिद्धांत आहे.

असें असून लिंगण्णाकवीनें इतके खोटें लिहिण्याचें कारण हेंच कीं तो केळदिराजांचा आश्रित होता व त्या राजांची चरित्रें अत्यद्भुतपणें लिहून त्याच्या काळांत असलेल्या राजाचें प्रेम संपादन करण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. काशीयात्रेला गेलेल्या यात्रेकरूनीं कपिलधारातीर्थावरील शिलालेखांत असलेले व्यंकटप्पा नायकाचें नांव पाहून त्याला सांगितले असावे व तें दोड्डसंकण्णाच्या धाकट्या मुलाचेच असावे असें मानून तो विषय वाढवून काशी पंचक्रोशीची यात्रा संकण्णा नायकानेंच केली असली पाहिजे असें त्यानें लिहिलें. लिंगण्णा-कवी वीरशैवेतर असल्यामुळें केळदिराजाच्या पराक्रमाचें प्रदर्शन करतां करतां उत्तर हिंदुस्तानांतील जंगमांचे मठ वगैरे सर्व अर्वाचीन आहेत असें दाखवून वीरशैवांच्या अपकर्षाचा प्रसार करण्याचेंहि धाडस त्यानें केले असले पाहिजे. पण इतिहासशास्त्रज्ञ जर उत्तम प्रकारें परिशीलन करतील तर केळदिनृपविजयांतील अनेक गोष्टी विपर्यस्त आहेत असेंच सिद्ध होईल यांत शंकाच नाहीं. केळदिनृपविजयाची जुनी प्रत घेऊन काशी पीठाच्या कोणी विरोधकानें त्यामध्यें वरील खोटा मजकूर घुसडून दिला असल्याचाहि संभव आहे. या पुस्तकांतील विधानें इतिहासशास्त्रसिद्ध आहेत कीं नाहींत ते पाहण्या पूर्वीच जर कोणी अंधश्रद्धेनें त्यानां ऐतिहासिक महत्व देऊं लागला तर दगडाच्या नंदीचे नाकांत भक्तीनें बोट घातले असतां विंचू चावल्या प्रमाणेंच स्थिति व्हावयाची. काशी पीठाचा इतिहास सिद्ध करण्यासाठीं श्रीविश्वाराध्य महासंस्थानांतील कागदपत्रच पाहिलें पाहिजेत. लिंगण्णाकवीची व केळदि-नृपविजयाची योग्यता नाहीं. आपल्याच केळदिराजांच्या शिलालेखांचीहिं विपर्यस्त माहिती देणारा लिंगण्णाकवी दूरदेशांत असलेल्या काशीपीठाच्या जंगमवाडीची विपर्यस्त माहिती देतो यांत कांहींच नवल नाहीं.

लिंगण्णाकवीची वरील—लायकी न ओळखून बेळगांवच्या गुरुलिंगप्पानें विरक्तपक्षाच्या ( घोळपंथाच्या ) मठ्ठपणामुळें असो किंवा आपल्या

अल्पमतीच्याच घमेंडीमुळें असो कपिलधारातीर्थावरील शिलालेख न पाहतांच श्रीकाशीपीठाचे बाबतींत विचारशून्य लेख प्रसिद्ध करून गुरुद्रोह करण्याचे व वीरशैवइतिहासाची हानि करण्याचें साहस केले आहे. पण सूर्यावर थुंकणाऱ्याच्याच अंगावर थुंकी पडते त्याप्रमाणें या साहसानें गुरुलिंगप्पानें आपलेंच तोंड कलंकित करून घेतले आहे. त्याच्या असल्या लिहिण्यानें काशी जगद्गुरुपीठाची कांहींच हानि होणार नाहीं. म्हणून अशा मायावी लोकांच्या नादीं न लागतां अनादि संसिद्ध श्रीमद्वीरशैवांच्या इतिहासावर संपूर्ण विश्वास ठेवून परशिवाच्या कृपेस पात्र व्हावे असे समस्त शुद्ध वीरशैव सज्जनानां सादर निवेदन आहे.

॥ सत्यमेव जयति ॥



